नव्याने निर्माण करण्यात आलेल्या दिव्यांग कल्याण विभागास जागा उपलब्ध करुन देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्र. शाकाजा-११२३/प्र.क्र.३९/२०२३/२२,**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक : २३ मे, २०२३

<u>संदर्भ</u> : शासन अधिसूचना, क्र.शाकानि-२०२२/प्र.क्र.६७/१८ (र. व का.), दिनांक १५.१२.२०२२

**<u>प्रस्तावना :-</u>**

संदर्भाधीन दिनांक १५.१२.२०२२ च्या अधिसूचनेन्वये सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागामधून "दिव्यांग कल्याण" हा स्वतंत्र मंत्रालयीन विभाग निर्माण करण्यात आला आहे. दिव्यांग कल्याण विभागाने मित्तल टॉवर, ३ रा मजला, नरीमन पॉईन्ट येथील खाजगी इमारतीमध्ये ३०८० चौ.फूट जागा तात्पुरत्या स्वरुपात भाडेतत्वावर घेतली आहे. सदर जागा मंत्रालयापासून ४००-५०० मिटर अंतरावर आहे. मंत्रालयातील सर्व विभागांशी निगडीत कामाबाबत दिव्यांगांना मंत्रालयात येण्याची आवश्यकता असते. दिव्यांग कल्याण विभागाचे कार्यालय मंत्रालयाबाहेर असल्यास दिव्यांगांना मंत्रालय व दिव्यांग कल्याण विभाग असा संपर्क करण्याबाबत अतिशय जिकरीचे व त्रासाचे होईल. त्यामुळे याबाबतची संवेदनशिलता विचारात घेता दिव्यांग कल्याण विभागाला मंत्रालयामध्ये तळमजला किंवा पहिला मजला येथे जागा उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. त्यानुषंगाने दिव्यांग कल्याण विभागास मंत्रालय इमारतीमध्ये तळमजला किंवा पहिला मजला येथे जागा वाटप करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे:-

**शासन निर्णय :-**

पर्यटन व सांस्कृतिक कार्ये विभागाची मंत्रालय मुख्य इमारत, तळमजला आणि मंत्रालय विस्तार इमारत पहिला, चवथा व पाचवा मजला येथील २३४२ चौ.फूट जागा व सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाची मंत्रालय विस्तार इमारतीमधील पहिल्या मजल्यावरील ७०० चौ.फूट जागा अशी एकूण ३०४२ चौ.फूट जागा नव्याने निर्माण केलेल्या दिव्यांग कल्याण विभागास वाटप करण्यात येत आहे.

२. वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग-पहिला, उप-विभाग-एक मधील अनुक्रमांक १० नियम क्रमांक ११५ अन्वये कार्यालयासाठी जागा भाडयाने घेण्यास व भाडे प्रदान करण्यास मंजूरी घेण्याबाबत प्रशासनिक विभागास पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आले आहेत. सदर अधिकाराचा वापर करुन पर्यटन व सांस्कृतिक कार्ये विभागासाठी आवश्यक असणारी जागा भाडयाने घेण्याची कार्यवाही पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागाने एक महिन्यामध्ये पूर्ण करुन मंत्रालयातील जागेचा ताबा दिव्यांग कल्याण विभागास देण्यात यावा.

३. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने त्यांच्या ताब्यातील मंत्रालय विस्तार इमारतीमधील पहिल्या मजल्यावरील ४५६७ चौ.फूट जागेपैकी ७०० चौ. फूट जागा रिक्त करुन त्याचा ताबा दिव्यांग कल्याण विभागास देण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय मा. मुख्यमंत्री महोदयांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत असल्यामुळे सदर निर्णयाची तात्काळ अंमलबजावणी करण्यात यावी.

५. कार्यकारी अभियंता, इलाखा शहर (सा.बां.) विभाग, बांधकाम भवन, मुंबई यांनी उपरोक्त जागेचा ताबा संबंधितांना दयावा व त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०५२३१२००१५३४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by BHAGURE DEVIDAS SANDUJI
Date: 2023.05.23 12:00:14 +05'30'

**( दे. सां. भगुरे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. सर्व सन्माननीय विधानसभा/परिषद व संसद सदस्य
२. मा.सभापतींचे सचिव/मा.अध्यक्षांचे सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
३. विरोधी पक्षनेते, दोन्ही सभागृह, महाराष्ट्र विधान मंडळ, मुंबई
४. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिवांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
५. मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिवांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
६. सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
७. मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२.
८. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
९. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
१०. सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११. सह/उप सचिव, दिव्यांग कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
१२. सह/उप सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्ये विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
१३. सह/उप सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
१४. उप सचिव (कार्या.२२), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१५. कार्यकारी अभियंता, इलाखा शहर (सा.बां.) विभाग, बांधकाम भवन, २ रा मजला, मर्झबान रोड, फोर्ट,मुंबई-०१.
१६. उप अभियंता, दक्षिण उपविभाग, सार्वजनिक बांधकाम विभाग, एम.टी.डी.सी.समोर, मुंबई.
१७. शाखा अभियंता, मंत्रालय शाखा (स्थापत्य), सा.बां. मंत्रालय आवार, मंत्रालय, मुंबई.
१८. शाखा अभियंता (सा.बां.) बंगलो, नविन प्रशासन भवन, तळमजला, मंत्रालय, मुंबई-३२
१९. निवडनस्ती.